मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथील मुळ याचिका क्र.३२२५/२०२० डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन शिक्षण संस्था, अमरावती विरुध्द महाराष्ट्र शासन यामध्ये मा. न्यायालयाने दि.२४/०३/२०२१ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार सदर शाळेतील शिक्षकांना अनुदानासाठी पात्र करुन थकीत वेतन अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : न्यायाप्र -२०२१/प्र.क्र ११२/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक , मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :- ३ डिसेंबर, २०२१

वाचा:- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण-२०११/(४४७/११)/प्राशि-३, दिनांक ०२.०५.२०१२
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.प्राशाअ-२०१३/(१२४/२०१३)/प्राशि-३, दिनांक २५.०६.२०१३.
(३) शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. प्राशाअ-२०१३/(१२४/२०१३)/प्राशि-३, दिनांक २५.०२.२०१४.
(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. अनुवि-४९१३/(५७/१३)/अर्थसंकल्प (१),दिनांक १८ जानेवारी, २०१४.
(५) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. अमरावती यांचे आदेश क्र. जिप/शिक्षण/खाप्राशा/९५५/२०१५, दिनांक २१ जानेवारी,२०१६.
(६) अधीक्षक, वेतन व भ.नि.नि. पथक (प्राथमिक), अमरावती यांचे पत्र क्र. वेपप्रा/अम/वेतन/१३१/२०२१, दिनांक १६ एप्रिल, २०२१
(७) अधीक्षक, वेतन व भ.नि.नि. पथक (प्राथमिक), अमरावती यांचे पत्र क्र. वेपप्रा/अम/वेतन/२१३/२०२१, दिनांक ०२ ऑगस्ट, २०२१
(८) अधीक्षक, वेतन व भ.नि.नि. पथक (प्राथमिक), अमरावती यांचे पत्र क्र. वेपप्रा/अम/वेतन/२४९/२०२१, दिनांक १५ सप्टेंबर, २०२१
(९) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं/ खाप्राशा/ अंदाज-२०३/न्या.प्र./२०२१/३१६७, दिनांक २७ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये राज्यात दिनांक ३.१०.२०११ ते दि.०५.१०.२०११ या कालावधीत विद्यार्थी उपस्थितीबाबत राबविण्यात आलेल्या पटपडताळणी मोहिमेच्या आधारावर करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना निर्गमित केल्या होत्या.

२. शासन निर्णय, संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णय, दि. २५.०६.२०१३ अन्वये मान्यताप्राप्त विनाअनुदानित खाजगी प्राथमिक शाळेतील वर्ग अनुदानाचे यादीत **"प्रपत्र-अ" मध्ये "अ.क्र. १५९"** वर डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन शिक्षण संस्था संचलित डॉ. राधाकृष्णन विद्यामंदीर मराठी प्राथमिक शाळा,सातुणा, जि. अमरावती या शाळेचा समावेश असून, सदर शाळेच्या इयत्ता १ ली ते ४ थी (प्रथम तुकडी) पटपडताळणी मध्ये शाळेची मान्यता काढण्याची प्रक्रीया सुरु असल्याचे नमूद आहे.

३. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार पटपडताळणीच्या अनुपस्थितीच्या कारणास्तव शाळांची मान्यता काढता येत नसल्याने, संदर्भ क्र. (३) येथील शासन शुद्धिपत्रक दि. २५.०२.२०१४ अन्वये, डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन शिक्षण संस्था संचलित डॉ. राधाकृष्णन विद्यामंदीर मराठी प्राथमिक शाळा,सातुणा, जि. अमरावती या शाळेची इयत्ता १ ली ते ४ थी (प्रथम वर्ग) तुकडीस डी.एड ४ पदे जून, २०१० पासून २० टक्के अनुदानास पात्र ठरविण्यात आली आहेत.

४. डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन शिक्षण संस्था संचलित डॉ. राधाकृष्णन विद्यामंदीर विद्यामंदीर मराठी प्राथमिक शाळा, अमरावती यांनी उच्च न्यायालयात दाखल केलेल्या एलडी-व्हीसी याचिका क्र. १२८/२०२०, याचिका क्रमांक ३२२५/२०२० मध्ये मा. न्यायालयाच्या दि. २४.०३.२०२१ च्या आदेशान्वये संबंधित संस्थेस जून, २०१० पासून वेतन अनुदान अदा करण्याचे आदेश अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक) अमरावती यांना दिले आहेत. तसेच सदर प्रकरणी उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार कार्यवाही न झाल्यामुळे सदर संस्थेने मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे अवमान याचिका क्र. १७३/२०२१ दाखल केली आहे.

५. मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठाच्या आदेशाच्या अनुषंगाने संदर्भ क्र.(६) (७)(८)व (९) अन्वये डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन शिक्षण संस्था संचलित डॉ. राधाकृष्णन विद्यामंदीर विद्यामंदीर मराठी प्राथमिक शाळा, अमरावती यांना माहे जून, २०१० पासून थकित वेतन अदा करण्याचा, तसेच, शालार्थ प्रणालीमध्ये थकित वेतन ऑनलाईन पध्दतीने काढण्याची सुविधा उपलब्ध नसल्याने, थकित वेतन ऑफलाईन पध्दतीने काढण्यास मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेले विवेचन विचारात घेता, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ३२२५/२०२० मध्ये मा. न्यायालयाने दिनांक २४.०३.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार, संदर्भ क्र. क्र.(६) (७)(८)व (९) येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन शिक्षण संस्था संचलित डॉ. राधाकृष्णन विद्यामंदीर विद्यामंदीर मराठी प्राथमिक शाळा,

अमरावती या शाळेस, शासन निर्णय, दि.२५.०६.२०१३ मधील अनुदान पात्र शाळांना, संदर्भ क्र.(४) येथील शासन निर्णय, दि.१८.०१.२०१४ नुसार ज्या प्रमाणे जानेवारी, २०१४ पासून वेतन अनुदानाचा टप्पा अनुज्ञेय आहे, त्यानुसारच जानेवारी, २०१४ पासून वेतन अनुदानाच्या टप्प्यानुसार वेतन अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच, सदर संस्थेच्या शाळेस, माहे जानेवारी, २०१४ पासून फेब्रुवारी, २०२१ या कालावधीतील वेतन थकबाकी व ७ व्या वेतन आयोगाच्या फरकाचा पहिल्या हप्त्याचे देयक अदा करण्याकरीता होणाऱ्या रु.१,०८,५७,०८४/- ( रुपये एक कोटी आठ लक्ष सत्तावण्ण हजार चौऱ्याऐंशी फक्त ) इतक्या खर्चास व याबाबतचे देयक ऑफलाईन पध्दतीने स्विकारण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन शासन मान्यता देत आहे.

१) अनुदान वितरीत करण्यापूर्वी संबंधित शाळा सर्व निकष व अटींची पूर्तता करीत असल्याची खात्री करुन अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही संबंधित शिक्षण उपसंचालक यांनी करावी.

२) अनुदानास पात्र ठरलेल्या शाळेसंदर्भात काही तक्रारी प्राप्त झाल्या असल्यास त्याची शहानिशा करुन सदर शाळेस अनुदान वितरीत करावे.

३) शाळा अनुदानास पात्र झाली म्हणजे त्या शाळेस अनुदानाचा हक्क प्राप्त होत नाही. अनुदानास पात्र घोषित केलेल्या शाळांना अनुदान मंजूर करणे हा शासनाचा स्वेच्छाधिकार असुन निधीच्या उपलब्धतेनुसार शासन अनुदान मंजूर करण्याचा निर्णय घेईल. सदर अनुदान हे भूतलक्षी प्रभावाने लागू राहणार नाही. राज्याची आर्थिक स्थिती, वेळोवेळी उपलब्ध होणारे आर्थिक संसाधने, राज्याच्या गरजा व त्यांचा प्राधान्यक्रम विचारात घेऊन शासन अनुदानाच्या सुत्रात बदल करील व ज्या शाळांना अनुदान मंजूर करण्यात आले नाही त्या शाळांना जेंव्हा अनुदान मंजूर करावयाचे असेल त्यावेळेचे अनुदान सुत्र त्यांना लागू राहील.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक ई-२ लेखाशिर्ष-२२०२ सर्वसाधारण शिक्षण ०१, प्राथमिक शिक्षण, (०५) स्थानिक संस्थाना प्राथमिक शिक्षणाच्या विस्तारासाठी अनुदान (०५)(०४) खाजगी प्राथमिक शाळांना अनुदान (अनिवार्य) (२२०२ ३२६१) ३६-सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०७३/२०२१/व्यय-५, दि.०२.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२११२०३१८२८३४८८२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2021.12.03 18:48:58 +05'30'

**(इ.मु. काझी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय , मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
५) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव ( वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव ( शालेय शिक्षण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ,
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) शिक्षण संचालक (प्राथमिक) म.रा. पुणे,
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र , १/२ मुंबई / नागपुर,
१२) महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र , १/२ मुंबई / नागपुर,
१३) महालेखापाल (स्थायिक निकाल लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपुर,
१४) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुबई.
१५) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग
१६) शिक्षणाधिकारी (प्राथमिक) जिल्हा परिषद, अमरावती
१७) अधिक्षक वेतन पथक (प्राथमिक) जिल्हा परिषद, अमरावती
१८) निवड नस्ती, एसएम-४